**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा), नागपूर मंडळास गृहनिर्माण योजना राबविण्यासाठी जमीन उपलब्ध करून देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नाजक-२०१५/प्र.क्र.५०/नाजकधा-३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ०९ जून, २०१५.

वाचा :-

**१) शासन निर्णय क्रमांकः नाजक-१०(२००८)/प्र.क्र.११९/नाजकधा-१, दि.०३ डिसेंबर, २००८.**
**२) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा, मुंबई यांचे अ.शा.पत्र क्र.एमएच/एलक्यूएन/शा.ज./प्र.क्र.७९/१६४७, दि.२४/४/२०१५.**

प्रस्तावना :-

नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ अंतर्गत संपादित केलेल्या जमिनीचे वाटप करण्याबाबत शासनाने शासन निर्णय दि.३/१२/२००८ अन्वये जमीन वाटपाबाबतचे सर्व समावेशक धोरण निश्चित केले आहे.

सदर शासन निर्णयानुसार नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ अंतर्गत शासनाने ताब्यात घेतलेल्या जमिनीपैकी ४००० चौ. मी. पेक्षा मोठ्या किंवा कमी आकारमानाच्या निवासी जमिनीची मागणी एम.एम.आर.डी.ए. / महानगरपालिका / म्हाडा यासारख्या शासकीय उपक्रमांनी केली असल्यास, अशा जागांचे वाटप या संस्थांना, शासन मान्यतेने व शासनाने ठरविलेल्या दराने करण्याची तरतूद आहे.

उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सर्व सामान्य जनतेकरीता परवडणाऱ्या घरांची उद्धिष्ट पूर्तता करणेच्या दृष्टीने, नागपूर शहरालगत तसेच नागपूर, म्हाडा विभागांतर्गत गृहनिर्माण योजना राबविणेकरीता नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ अंतर्गत शासनास प्राप्त झालेल्या जमिनीची मागणी संदर्भ क्र.२ वरील पत्रान्वये शासनाकडे केली आहे. त्या अनुषंगाने म्हाडा, नागपूर मंडळ या शासकीय उपक्रमास अत्यल्प, अल्प व मध्यम उत्पन्न गटाकरीता परवडणाऱ्या घरांच्या निर्मीतीसाठी नागपूर नागरी समुहातील त्यांनी मागणी केलेली जमीन हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर शहरालगत तसेच नागपूर विभागांतर्गत गृहनिर्माण योजना राबवून अत्यल्प, अल्प व मध्यम उत्पन्न गटातील लोकांना परवडणाऱ्या घरांची निर्मीती करणेसाठी, नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ अंतर्गत संपादित करण्यात आलेल्या खालील नमुद जमिनी म्हाडा, नागपूर मंडळास हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | मौजा / गावाचे नाव | सर्व्हे क्रमांक | जमिनीचे क्षेत्र हेक्टरमध्ये |
|---|---|---|---|
| १. | वांजरा, तह.नागपूर (शहर) | ११-१२/३ | ०.२४७ |
| २. | चिचभूवन, तह.नागपूर (शहर) | १७९-१८०/२ | ०.२१७ |
| ३. | जयताळा, तह.नागपूर (शहर) | १६० | ०.१०८ |
| ४. | भामटी, तह.नागपूर (शहर) | १३/३ पैकी | ०.३७ |
| ५. | चिखली (देवस्थान), तह.नागपूर (शहर) | ४६, ४९ | १.३११ |
| ६. | दिघोरी, तह.नागपूर (शहर) | १८/५ पैकी | ०.३९ |
| ७. | वाडी, तह.नागपूर (ग्रामिण) | ७६-७७, ९२/५ (जुना) ९९ (नवीन) | ०.२३ |
| ८. | बेलतरोडी, तह.नागपूर (ग्रामिण) | ४/१, ४/२, १८, ९/२, ९/३ | ०.८७८ |
| ९. | शंकरपूर, तह.नागपूर (ग्रामिण) | ११३/३ | ०.२२० |
| १०. | वानाडोंगरी, तह.हिंगणा | १०० | ०.५३ |
| ११. | हजारी पहाड, तह.नागपूर (शहर) | ९२/३ | १.०३ |
| | एकूण | | ५.५३१ |

प्रस्तुत जमिनी, सर्व सामान्य जनतेला परवडणाऱ्या घरांच्या निर्मीतीच्या उद्देशाकरीताच वापरण्याच्या अटीवर शासन निर्णय क्र.एल.जी.एल.-१०८१/८७४४-सी.आर-१४४७-जी-५, दि.१६/२/१९८५ मधील दराने, विहीत अटी व शर्तीच्या अधिन राहून हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

जिल्हाधिकारी, नागपूर यांनी प्रस्तुत जमिनीचा ताबा म्हाडा, नागपूर मंडळाकडे देण्याची नियमानुसार पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०९१७४८२०२१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMADHAN VASANTRAO KHATKALE

Digitally signed by SAMADHAN VASANTRAO KHATKALE
DN: CN = SAMADHAN VASANTRAO KHATKALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPT,CID - 918050
Date: 2015.06.09 17:51:12 +05'30'

**(समाधान खटकाळे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
५. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
६. मा.राज्यमत्री (नाजकधा) यांचे खाजगी सचिव.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.विभागीय आयुक्त, नागपूर.
१२.जिल्हाधिकारी, नागपूर.
१३.अतिरिक्त जिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, नागपूर.
१४.निवडनस्ती (नाजकधा-१ / नाजकधा-२ / नाजकधा-३), नगर विकास विभाग, मुंबई.